लातूर शहर महानगरपालिकेच्या स्थायी समितीने संमत केलेला ठराव क्र. ६० दि. २५.०१.२०१६ विखंडीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : लामनपा-२०१४/११२५/प्र.क्र.२८९/नवि-२४**
मादाम कामा रोड,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- ०५.०१.२०१७

<u>वाचा</u> :- आयुक्त,लातूर शहर महानगरपालिका यांचे पत्र क्र. जा.क्र./लामनपा/माव्य/२०१६/ १०३४१, दिनांक ३.१२.२०१६

**शासन निर्णय :**

लातूर शहर महानगरपालिकेने सन १९७५ मध्ये लातुर शहराचा विकास आराखडा जाहिर केला होता. सदरच्या विकास आराखडयात सर्वे नं. १३९ मध्ये साईट नं. १११ व ११२ यावर अनुक्रमे कल्चरल सेंटर व चिल्र्डन पार्क असे आरक्षण होते. शासन अधिसुचना दिनांक १४.१२.१९९९ व १४.१.२००० अन्वये सदरच्या विकास आराखडयातील आरक्षण क्र. १११,११२ व ११२- अ हे क्षेत्र आणि आकार यामध्ये बदल करण्यात आले. त्या बदलाबाबत, मा. उच्च न्यायालयात याचिका क्र. १११२/२००० मध्ये मा. उच्च न्यायालयाने दिनांक १७.१०.२०१५ रोजी आदेश दिले असतानाही दिनांक १५.१०.२०१६ रोजी लातुर महानगरपालिकेच्या स्थायी समितीने मा. उच्च न्यायालयाच्या सदर आदेशाविरोधात ठराव क्र. ६० दि. २५.०१.२०१६ मंजूर केला. सदरच्या पारीत केलेल्या ठरावाच्या अनुषंगाने महानगरपालिकेच्या स्थायी समितीने, महानगरपालिकेच्या हिताच्या विरुध्द, स्वत: स प्राप्त असलेल्या अधिकाराचा दुरुपयोग करुन,महानगरपालिकेच्या मालमत्तेची वाटणी करणेबाबत, सर्व सामान्य जनतेचे नुकसान करण्याबाबतचा सदर ठराव पुढील कारणास्तव विखंडीत करणे आवश्यक आहे.

**अ**) महानगरपालिकेची जागा व गाळे भाडेपट्टयाने देणेच असल्यास सामान्य प्रशासन विभागाचा दि. ३.१२.२०१४ च्या शासन निर्णयान्वये एक लक्ष किंवा त्यापेक्षा जास्तीच्या किंमतीसाठी ई-लिलाव प्रक्रिया अवलंब करणे बंधनकारक आहे. स्थायी समितीला व्यक्ती अथवा संस्थेला थेट जागा/गाळे भाडयाने देण्याचे अधिकार नाही.

**ब**) महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम १९४९ मधील कलम ७९ (ड) अन्वये अधिमुल्य भाडे किंवा अन्य मोबदला चालू बाजार किंमतीपेक्षा कमी असता कामा नये. सदर प्रकरणातील भाडयाचे दर हे चालू बाजारभावापेक्षा/ प्रचलित दरापेक्षा कमी असल्याने महापालिकेचे आर्थिक नुकसान होणार आहे.

३. लातूर शहर महानगरपालिकेच्या स्थायी समितीने, पारीत केलेला ठराव क्र. ६० दि. २५.१.२०१६ हा महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील तरतुदींचा उल्लंघन करणारा असल्याने तसेच महानगरपालिकेस आर्थिकदृष्टया अहीतकारक असल्याने लातूर शहर महानगरपालिका स्थायी समितीचा ठराव क्र. ६० दि. २५.१.२०१६ हा विखंडीत करण्यासाठी महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम कलम ४५१ (१) नुसार प्रथमत: १ महिन्याच्या कालावधीसाठी निलंबित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१७०१०५१८१७१११३२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sudhakar Dnyandeo Bobade

Digitally signed by Sudhakar Dnyandeo Bobade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bc1634ab95abe4652ec2433f0ccd505c20ea3e7ecad3bfcb55d49ad9dbd0fe5e, serialNumber=2e4705465b9bdfd5b38b2d36aae83659869796cb8cc2aefbc550989feec27db1, cn=Sudhakar Dnyandeo Bobade
Date: 2017.01.05 18:55:53 +05'30'

**( सुधाकर ज्ञा.बोबडे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
२) आयुक्त, लातूर महानगरपालिका औरंगाबाद.
३) नगर सचिव लातूर महानगरपालिका
४) मा. सचिव (नवि-२) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
५) उप सचिव (नवि-२४) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
६) निवड नस्ती (नवि-२४) (२ प्रती).